**संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत पात्र दिव्यांग लाभार्थ्यांच्या वार्षिक कौटुंबिक उत्पन्न मर्यादेत वाढ करणे तसेच या योजनेअतंर्गत दिव्यांग लाभार्थ्यांच्या मासिक अनुदानात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विसयो-२०१७/प्र क्र.२०३/विसयो.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :-**

१. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.विसयो २०१०/ प्र.क्र.१७५/विसयो-२, दिनांक २६.१०.२०१०,
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.विसयो-२०११/ प्र.क्र.१२७/विसयो-२, दिनांक ३१.१०.२०११.

**प्रस्तावना :-**

दिव्यांग व्यक्तींना संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत मिळणा-या अनुदानात वाढ करण्याबाबत मा. लोकप्रतिनिधी, विविध अपंग संघटना व स्वयंसेवी संस्था यांच्या माध्यमातून शासनाकडे वारंवार मागणी व पाठपुरावा करण्यात येत होता. तसेच संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत ४० ते ७९ % दिव्यांगता असलेल्या दिव्यांगांना देण्यात येणारे अर्थसहाय्य वाढवून प्रतिमाह रुपये ८००/- तर ८०% व अधिक दिव्यांगता असलेल्या दिव्यांगांना प्रतिमाह रुपये १०००/- निवृतीवेतन देण्याबाबत, मा.मंत्री (वित्त) यांनी सन २०१८ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये घोषणा केली आहे. त्याअनुषंगाने सदरहू योजनेअंतर्गत दिव्यांग व्यक्तींना देण्यात येणा-या अनुदानात वाढ करण्याचा तसेच सदर योजनेच्या पात्रतेसाठी दिव्यांग लाभार्थ्यांच्या वार्षिक कौटुंबिक उत्पन्न मर्यादेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने दिनांक ०३ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्यता मिळाल्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१) संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेतील ४० ते ७९ टक्के दिव्यांग व्यक्तींना देण्यात येत असलेल्या रुपये ६००/- इतक्या मासिक अनुदानात रुपये २००/- इतकी वाढ करुन रुपये ८००/- प्रतिमाह तर ८० टक्के व अधिक दिव्यांग व्यक्तींना देण्यात येत असलेल्या रुपये ६००/- इतक्या मासिक अनुदानात रुपये ४००/- इतकी वाढ करुन रुपये १०००/- प्रतिमाह अशी वाढ करण्यात येत आहे.

२) दिव्यांग लाभार्थ्यांसाठी राज्य पुरस्कृत विशेष सहाय्य योजनांकरिता वार्षिक कौटुंबिक उत्पन्न मर्यादा रु.२१,०००/- वरुन रु.५०,०००/- अशी करण्यात येत आहे.

३) लाभार्थ्यांच्या अनुदानासाठी आवश्यक तरतूद सर्वसाधारण/अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी करण्यात आलेल्या विशेष सहाय्य योजनेच्या तरतुदीमधून करण्यात येईल.

४. सदर अनुदान वाढ ही संजय गांधी निराधार अनुदान योजना, श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन व इंदिरा गांधी राष्ट्रीय अपंग निवृत्तीवेतन योजना या योजनेतील सर्व दिव्यांग लाभार्थ्यांना त्यांच्या दिव्यांगत्वाच्या प्रमाणानुसार लागू होईल.

५. उपरोक्त योजनांमधील सुधारणेपूर्वीच्या व सुधारणेनंतरच्या अनुदानाबाबतचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रात नमूद केला आहे.

६. हा शासन निर्णय दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१८ पासून अंमलात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सगणक संकेतांक २०१८११०३१८५२१८५१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ed e8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2018.11.06 13:01:12 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३) सर्व जिल्ह्यांचे पालक मंत्री,
४) सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
५) सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
६) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली,
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

११) संचालक, नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई,
१२) वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,
१३) सर्व मंत्रालयीन विभाग/सर्व विभागीय आयुक्त /सर्व महापालिका आयुक्त/सर्व पोलीस आयुक्त
१४) सर्व जिल्हाधिकारी / सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक / सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१५) संचालक ,लेखा व कोषागारे, मुंबई
१६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१८) विभागीय समाजकल्याण अधिकारी ( मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर)
१९) सर्व उप विभागीय अधिकारी/उप जिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी) / सर्व तहसिलदार,
२०) सर्व कोषागार अधिकारी / सर्व उप कोषागार अधिकारी,
२१) सर्व पंचायत समितीचे गट विकास अधिकारी,
२२) सर्व अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) निवड नस्ती, विसयो.

शासन निर्णय, क्र.विसयो-२०१७/प्र.क्र.२०३/विसयो, दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०१८ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | योजना | केंद्र पुरस्कृत/ राज्य पुरस्कृत | वयोगट | दिव्यांगत्व प्रमाण | दिव्यांगासाठी यापुर्वी असलेले अनुदान | | | दिव्यांगासाठी दि. ०३ नोव्हेंबर, २०१८ च्या शासन निर्णयनुसार सुधारित अनुदान | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण अनुदान | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण अनुदान |
| १ | संजय गांधी निराधार अनुदान योजना (सं.गां.नि.अ.यो.) | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ४० ते ७९ टक्के | ० | ६०० | **६००** | ० | ८०० | **८००** |
| २ | संजय गांधी निराधार अनुदान योजना | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ८० टक्के व अधिक | २०० | ४०० | **६००** | २०० | ८०० | **१०००** |
| ३ | संजय गांधी निराधार अनुदान योजना | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ८० टक्के व अधिक | ० | ६०० | **६००** | ० | १००० | **१०००** |
| ४ | श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (श्रा.बा.से.रा.नि.यो.) | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षावरील | ४० ते ७९ टक्के | ० | ६०० | **६००** | ० | ८०० | **८००** |
| ५ | श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षावरील | ८० टक्के व अधिक | २०० | ४०० | **६००** | २०० | ८०० | **१०००** |
| ६ | श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षावरील | ८० टक्के व अधिक | ० | ६०० | **६००** | ० | १००० | **१०००** |
| ७ | इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षावरील | ४० ते ७९ टक्के | २०० | ४०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **६००** | २०० | ६०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **८००** |
| ८ | इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षावरील | ८० टक्के व अधिक | २०० | ४०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **६००** | २०० | ८०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **१०००** |
| ९ | इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ४० ते ७९ टक्के | २०० | ४०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **६००** | २०० | ६०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **८००** |
| १० | इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ८० टक्के व अधिक | २०० | ४०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **६००** | २०० | ८०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **१०००** |
| ११ | इंदिरा गांधी राष्ट्रीय अपंग निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ८० टक्के व अधिक | २०० | ४०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **६००** | २०० | ८०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **१०००** |

दिव्यांग लाभार्थ्यांसाठी राज्य पुरस्कृत विशेष सहाय्य योजनांकरिता वार्षिक कौटुंबिक उत्पन्न मर्यादा रु.२१,०००/- वरुन रु.५०,०००/- अशी करण्यात येत आहे. ही सुधारणा दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१८ पासून अंमलात येईल.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2018.11.06 13:02:08 +05'30'

( प्रशान्त पुं. वाघ )

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन